महर्षि वाल्मिकी यांची जयंती
राज्यात साजरी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय, क्रमांक-जपुति-२२९९/२२५४/प्र.क्र.२४३/९९/२९,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ५ जानेवारी २०००

**शासन निर्णय** :- महर्षि वाल्मिकी जयंती प्रतिवर्षी आश्विन पौर्णिमेला शासनातर्फे साजरी करण्याचा शासनाने निर्णय घेतला असून सन २००० सालापासून महर्षि वाल्मिकी जयंती निमित्ताने त्यांच्या प्रतिमेला पुष्पहार अर्पण करुन आदरांजली वाहण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. चालू वर्षी दि. १३ ऑक्टोबर, २००० रोजी आश्विन पौर्णिमा असून त्या दिवशी महर्षि वाल्मिकी जयंती असल्याने त्या दिवशी मंत्रालयात मा. मुख्यमंत्री,मा. उप मुख्यमंत्री वा अन्य वरिष्ठ मंत्री महोदयांच्या हस्ते महर्षिंच्या प्रतिमेला पुष्पहार अर्पण करण्याचा कार्यक्रम आयोजित करुन त्यांना शासनातर्फे आदरांजली अर्पण करण्यात येईल.

२. तसेच राज्यातील विभागीय/जिल्हा पातळीवर अनुक्रमे विभागीय आयुक्त मुख्यालयात व जिल्हा मुख्यालयात असाच कार्यक्रम आयोजित करुन महर्षि वाल्मिकींना आदरांजली अर्पण करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ग्रं.वि.नलावडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. मुख्य सचिव व सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व आयुक्त, महानगरपालिका,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दी देण्यासाठी),
संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग (प्रशासन-४),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती-सा.प्र.वि/का.२९.

GR-20020124162820000-0100